महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे १०१४/प्र.क्र.२०७/२०१४/आस्था-३

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २५ ऑगस्ट, २०१४

**संदर्भ-**

१) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. मविसे-१०१४/प्र.क्र.५६/२०१४/ आस्था-३, दिनांक ३०.७.२०१४.
२) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. मविसे-१०१४/प्र.क्र.५६/२०१४/ आस्था-३, दिनांक २५.८.२०१४.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व (५) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने या विभागातील खालील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव पदनाम व सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|
| १. | श्री.ए.बी. जोशी,<br>गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती येवला,<br>जि.नाशिक | उप जिल्हा कार्यक्रम समन्वयक (मग्रारोहयो), जि.अहमदनगर | संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद दि.३०.७.२०१४ च्या आदेशातील अ.क्र.३७ वरील श्रीमती सी.बी. कोठावळे यांच्या तदर्थ पदोन्नतीने केलेल्या पदस्थापनेत संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद दि.२५.८.२०१४ च्या आदेशान्वये अंशत: बदल करुन रिक्त झालेल्या जागी. |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव पदनाम व सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|
| २. | श्री.राहूल साकोरे, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी, जि.पुणे | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता), जिल्हा परिषद, पुणे. | नवनिर्मित रिक्त पदावर. |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२५१९०३१५६१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: CN = Bandekar-Deshmukh Sarita Rishi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.08.25 20:24:09 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रधान सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, कोकण / नाशिक / पुणे

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक / अहमदनगर / पुणे / ठाणे
५) महालेखापाल - १ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
६) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.)
७) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
८) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
९) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
१०) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
११) कक्ष अधिकारी (कार्या-१२अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३.निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.